कार्यरत व सेवानिवृत्त राज्य शासकीय अधिकारी/कर्मचारी आणि अखिल भारतीय सेवेतील अधिकारी यांचे करिता वैद्यकीय प्रतिपूर्तीची विमाछत्र योजनेचे नुतनीकरण.

# महाराष्ट्र शासन

**वित्त विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण-२०१४/प्र.क्र.४०/भाग-१/कोषा-प्रशा-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २४ जुलै, २०२३.

वाचा : (१) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१४/प्र.क्र.४०/२०१४ कोषा प्रशा-४, दि.०९.०७.२०१४.
(२) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१४/प्र.क्र.४०/२०१४ कोषा प्रशा-४, दि.२५.०६.२०१५.
(३) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१४/प्र.क्र.४०/२०१४, कोषा प्रशा-४, दि.२८.०६.२०१६.
(४) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१४/प्र.क्र.४०/भाग -१/२०१४/कोषा प्रशा-४, दि.१७.०७.२०१७
(५) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१४/प्र.क्र.४०/भाग -१/कोषा प्रशा-४, दि.१६.०७.२०१८
(६) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१४/प्र.क्र.४०/भाग -१/कोषा प्रशा-४, दि.१९.०७.२०१९
(७) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१४/प्र.क्र.४०/भाग -१/कोषा प्रशा-४, दि.१३.०७.२०२०
(८) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१४/प्र.क्र.४०/भाग -१/कोषा प्रशा-४, दि.१६.०७.२०२१
(९) शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१४/प्र.क्र.४०/भाग -१/कोषा प्रशा-४, दि.२१.०७.२०२२

## प्रस्तावना-

उपरोक्त संदर्भ क्रमांक १ ते ९ च्या शासन निर्णयांन्वये, कार्यरत व सेवानिवृत्त राज्य शासकीय अधिकारी/कर्मचारी व अखिल भारतीय सेवेतील अधिकारी तसेच दि.३०.०६.२०११ नंतर सेवानिवृत्त झालेले शासकीय अधिकारी/कर्मचारी व कुटूंब निवृत्तीवेतनधारक यांचेकरिता गटविमा तत्वावर आधारित वैद्यकीय प्रतिपूर्तीची विमाछत्र योजना लागू करण्यात आली होती. आता योजनेच्या आढाव्याअंती कार्यरत व सेवानिवृत्त अधिकारी/कर्मचारी यांचेकरिता सुरु असलेल्या विमाछत्र योजनेचे दि.२५.०७.२०२३ ते दि.२४.०७.२०२४ या कालावधीसाठी नुतनीकरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

कार्यरत व सेवानिवृत्त अधिकारी/कर्मचारी यांचेकरिता सुरु असलेल्या विमाछत्र योजनेचे दि.२५.०७.२०२३ ते दि.२४.०७.२०२४ या कालावधीसाठी नुतनीकरणास मान्यता देण्यात येत आहे. प्रस्तुत वैद्यकीय प्रतिपूर्तीची विमाछत्र योजना कार्यरत/सेवानिवृत्त होणारे राज्य शासकीय अधिकारी/कर्मचारी आणि अखिल भारतीय सेवेतील अधिकारी यांना सक्तीची राहणार नसून स्वेच्छेने आवश्यक तो वार्षिक हप्ता भरून संबंधित अधिकारी/कर्मचारी या योजनेमध्ये सहभागी होऊ शकतील. या योजनेत केवळ दि.१ जुलै, २०२३ ते दि.३० जून, २०२४ या कालावधीत सेवानिवृत्त झालेले अधिकारी/कर्मचारी व शासकीय सेवेतील कार्यरत अधिकारी/कर्मचारी स्वेच्छेने आवश्यक तो वार्षिक हप्ता भरुन या योजनेमध्ये सहभागी होण्यास पात्र ठरतील. त्याचप्रमाणे योजनेमध्ये गतवर्षी समाविष्ट असलेले सर्व सदस्य नुतनीकरण करण्यासाठी पात्र ठरतील.

२. सन २०२२-२३ मध्ये सदर योजनेंतर्गत विमा कंपनीकडे एकूण प्रिमियम रक्कम रूपये २५.३६ कोटी जमा झाला आहे. तसेच दिनांक ३०.०६.२०२३ पर्यंत incurred claim ratio ९६% इतका झाला आहे. अद्याप पॉलिसीची मुदत दिनांक २४.०७.२०२३ पर्यंत शिल्लक असल्याने सदर कालावधीत उद्भवणाऱ्या दाव्यांची

संख्या विचारात घेता एकंदरीत incurred claim ratio ११५% ते १२०% इतका होण्याची शक्यता विमा कंपनीने वर्तवली आहे.

**३.** वैद्यकीय प्रतिपूर्तीच्या विमाछत्र योजनेमध्ये सदस्य नोंदणी होण्याची प्रमाण कमी होत असल्याने वर्ष २०२३-२४ मध्ये अधिकारी/कर्मचाऱ्यांचा सहभाग वाढावा, याकरिता कार्यरत अधिकारी/कर्मचारी यांच्या करिता वयोगट १८-३५ वर्षे, ३६-४५ वर्षे व ४६-५८ या वयोगटानुसार विमा हप्त्यांच्या दरामध्ये बदल करण्यात येत आहेत.

**४.** जे अधिकारी/कर्मचारी विमाछत्र योजना कालावधीमध्ये सेवानिवृत्त होणार आहेत. परंतु सदर योजनेमध्ये समाविष्ट होऊ इच्छित नाहीत, अशा कर्मचाऱ्यांकडून सदर योजनेमध्ये भविष्यातही समाविष्ट न होण्याबाबतचे घोषणापत्र **(Opting Out Declaration)** परिशिष्ट-१ मधील विहीत नमून्यात घेण्याची दक्षता संबंधित आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी.

**५.** सदर योजनेमध्ये नव्याने समाविष्ट होऊ इच्छिणाऱ्या सदस्यांना ९० दिवसांचा प्रतिक्षा कालावधी असेल. तसेच सोबत जोडलेल्या परिशिष्ट-२ मधील आजारांकरिता योजनेमध्ये नव्याने समाविष्ट होऊ इच्छिणाऱ्या सदस्यांना १८ महिन्यांचा प्रतिक्षा कालावधी असेल.

**६.** योजनेमध्ये गतवर्षी समाविष्ट सदस्यांनी चालू वर्षी ३० दिवसांपेक्षा अधिक कालावधीनंतर योजनेचे नुतनीकरण केल्यास ते योजनेमध्ये नव्याने समाविष्ट झाल्याचे समजले जाईल.

**७.** सोबत जोडलेल्या परिशिष्ट-२ मधील आजारांकरिता **२०%** Co pay लागू राहील.

**८.** ज्या हॉस्पिटल्समध्ये दि न्यु इंडिया अॅश्युरन्स कंपनी लि. यांचे PPN Network आहे, तेथेच फक्त PPN दर लागू राहतील.

**९.** तसेच सदर आदेशाशी विसंगत नसतील अशा मागील वर्षांच्या योजनेतील सर्व अटी व शर्ती सन २०२३-२४ साठीच्या योजनेकरिताही लागू राहतील.

**१०.** सन २०२३-२४ करीताचे सुधारित विमा हप्त्याचे दर (GST सह) पुढीलप्रमाणे दिले आहेत.

अ) **१८-३५** वर्षे वयोगटातील कार्यरत अधिकारी/कर्मचाऱ्यांसाठी विमा हप्त्याचे दर **(GST** सह)

| **अ.क्र.** | **विमा छत्र रक्कम** | **फक्त कर्मचारी स्वतः** | **१+३ (कर्मचारी, कर्मचाऱ्यांची पती/पत्नी, २ अवलंबित मुले २५ वर्षे वयाच्या मर्यादेत)** |
|---|---|---|---|
| | **रुपये** | **विमा हप्ता रुपये** | **विमा हप्ता रुपये** |
| १ | १ लाख | २९६७ | १६७११ |
| २ | २ लाख | ३५६१ | २२०५२ |
| ३ | ३ लाख | ४७४७ | ३०१३४ |
| ४ | ४ लाख | ५१४४ | ३३४३३ |
| ५ | ५ लाख | ६९२२ | ३८४१७ |
| ६ | ८ लाख | ९२४६ | ५८५६० |
| ७ | १० लाख | १०३२० | ७४७४० |
| ८ | १२ लाख | १२३८३ | ८६६९८ |
| ९ | १५ लाख | १३९३१ | ११३२९८ |
| १० | २० लाख | २०६३८ | १४६८०४ |

ब) ३६-४५ वर्षे वयोगटातील कार्यरत अधिकारी/कर्मचाऱ्यांसाठी विमा हप्त्याचे दर (GST सह)

| अ.क्र. | विमा छत्र रक्कम | फक्त कर्मचारी स्वत: | १+३ (कर्मचारी, कर्मचाऱ्यांची पती/पत्नी, २ अवलंबित मुले २५ वर्षे वयाच्या मर्यादेत) |
|---|---|---|---|
| | रुपये | विमा हप्ता रुपये | विमा हप्ता रुपये |
| १ | १ लाख | ३२६३ | १७९६९ |
| २ | २ लाख | ३९१६ | २३७११ |
| ३ | ३ लाख | ५२२२ | ३२४०२ |
| ४ | ४ लाख | ५६५७ | ३५९५० |
| ५ | ५ लाख | ७६१५ | ४१३०९ |
| ६ | ८ लाख | १०१७२ | ६२९६७ |
| ७ | १० लाख | ११३५२ | ८०३६६ |
| ८ | १२ लाख | १३६२१ | ९३२२४ |
| ९ | १५ लाख | १५३२३ | १२१८२६ |
| १० | २० लाख | २२७०२ | १५७८५३ |

क) ४६-५८ वर्षे वयोगटातील कार्यरत अधिकारी/कर्मचाऱ्यांसाठी विमा हप्त्याचे दर (GST सह)

| अ.क्र. | विमा छत्र रक्कम | फक्त कर्मचारी स्वत: | १+३ (कर्मचारी, कर्मचाऱ्यांची पती/पत्नी, २ अवलंबित मुले २५ वर्षे वयाच्या मर्यादेत) |
|---|---|---|---|
| | रुपये | विमा हप्ता रुपये | विमा हप्ता रुपये |
| १ | १ लाख | ३५०० | १८५७८ |
| २ | २ लाख | ४२०२ | २४५१६ |
| ३ | ३ लाख | ५६०१ | ३३५०० |
| ४ | ४ लाख | ६०६९ | ३७१६९ |
| ५ | ५ लाख | ८१६८ | ४२७१० |
| ६ | ८ लाख | १०९१० | ६५१०२ |
| ७ | १० लाख | १२१७८ | ८३०९० |
| ८ | १२ लाख | १४६१२ | ९६३८४ |
| ९ | १५ लाख | १६४३९ | १२५९५६ |
| १० | २० लाख | २४३५३ | १६३२०३ |

**ड) सेवानिवृत्त अधिकारी/कर्मचाऱ्यांसाठी विमा हप्त्याचे दर (GST सह)**

| अ.क्र. | विमा छत्र रक्कम | फक्त कर्मचारी स्वतः | १+१ (कर्मचारी, कर्मचाऱ्यांची पती/पत्नी) |
|---|---|---|---|
| | रुपये | विमा हप्ता रुपये | विमा हप्ता रुपये |
| १ | १ लाख | १८६३२ | २९८१४ |
| २ | २ लाख | २६२८६ | ४२०५४ |
| ३ | ३ लाख | २८२८० | ४५२४२ |
| ४ | ४ लाख | ३७४५३ | ६०९५८ |
| ५ | ५ लाख | ४०३८४ | ६४६०५ |
| ६ | ८ लाख | ६२१६१ | ९९४५० |
| ७ | १० लाख | ८३३६० | १३३२६८ |
| ८ | १२ लाख | ९७६७७ | १५६२९६ |
| ९ | १५ लाख | ११७५५९ | १८८०८० |
| १० | २० लाख | १६३४२६ | २५९४४९ |

**११.** यापूर्वी वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णयांतील खालील नमूद अटी व शर्ती कायम राहतील.

I. मागील वर्षी दाव्याच्या प्रतिपूर्तीचा लाभ घेतलेले जे सदस्य चालू वर्षी नुतनीकरण करणार नाहीत, त्यांना या योजनेत भविष्यात समाविष्ट होण्यास कायमस्वरूपी प्रतिबंधित करण्यात येईल.

II. विमा कंपनीच्या असे निर्देशनास आले आहे की, रूग्णालयात दाखल झाल्यानंतर विमा धारकाकडून त्याची माहिती त्रयस्थ प्रशासकास (TPA) विलंबाने दिली जाते. त्यामुळे दाव्याची सत्यता पडताळणी करण्यास अडचणी येतात. सबब, विमा धारकांनी प्रतिपूर्तीकरिता दावा सादर करतांना दाव्याची सूचना त्रयस्थ प्रशासकास (TPA) तीन दिवसांच्या आत न दिल्यास दाव्यावर **१०% "Co Pay"** लागु राहील. रुग्ण दाखल झाल्याच्या वेळेपासून २४ तासाचा एक दिवस या हिशोबाने शनिवार, रविवार व सर्व सार्वजनिक सुट्टया वगळून ३ दिवस मोजण्यात येतील.

III. जेथे PPN हॉस्पिटल उपलब्ध आहेत, अशा क्षेत्रामध्ये केवळ PPN पॅकेजेस प्रतिपूर्तीसाठी ग्राहय धरली जातील.

**स्पष्टीकरण:-अ)** विमा धारकास कोणत्याही PPN हॉस्पिटलमध्ये उपचार घेण्याची मुभा असेल तथापि प्रतिपूर्ती ही विमा कंपनीच्या PPN पॅकेजेसच्या दराप्रमाणे दिली जाईल. हॉस्पिटलचे दर व PPN दर यातील फरक विमा धारकाने सोसावयाचा आहे.

**ब)** PPN बाहेरील हॉस्पिटलमध्ये उपचार घेण्याचे स्वातंत्र्य विमा धारकास असेल, तथापि अशा प्रकरणी विमा कंपनीच्या प्रचलित धोरणानुसार हॉस्पिटलची अर्हता तपासून कंपनी दावा पारित करेल.

iv. विमाछत्र रक्कम रु.१० लाख ते रु.२० लाख मधील विमाधारकांना रुम रेंटमध्ये कॅपींग (Capping) खालीलप्रमाणे असेल.

| विमाछत्र रक्कम | सर्वसाधारण वास्तव्याकरिता | अतिदक्षता रुममधील वास्तव्याकरिता |
|---|---|---|
| **रु.१० लाख** | आश्वासित रकमेच्या १% व कमाल रु.८,०००/- च्या मर्यादेत | आश्वासित रकमेच्या २% व कमाल रु.१६,०००/- च्या मर्यादेमध्ये |
| **रु.२० लाख** | आश्वासित रकमेच्या १% व कमाल रु.१५,०००/- च्या मर्यादेत | आश्वासित रकमेच्या २% व कमाल रु.३०,०००/- च्या मर्यादेमध्ये |

Vi . सदर योजनेची उर्वरीत कार्यपद्धती संदर्भाधीन अ.क्र.१ ते ३ येथील शासन निर्णयातील तरतूदीनुसार राहील.

**१२.** आहरण व संवितरण अधिकारी यांनी सेवानिवृत्तीवेतन प्रकरणी फार्म क्र.४२ (A) कोषागार कार्यालयास सादर करताना संबंधित अधिकारी/कर्मचारी विमाछत्र योजनेमध्ये सहभागी असल्यास त्यानुसार सोबत जोडलेले **"परिशिष्ट-१"** मधील प्रमाणपत्र कोषागार कार्यालयास सादर करावे. तथापि, सेवानिवृत्त होणारा अधिकारी/कर्मचारी या योजनेव्यतिरीक्त अन्य वैद्यकीय विमा योजनेचा सभासद असल्यास अथवा या योजनेमध्ये सहभागी होण्यास इच्छुक नसल्यास संबंधित अधिकारी/कर्मचारी यांचेकडून **"परिशिष्ट-१"** मधील **घोषणापत्र** (Opting Out Declaration) भरुन घ्यावयाचे आहे. सदरचे घोषणापत्र सेवानिवृत्तीवेतन प्रकरणासोबत कोषागार कार्यालयास सादर करावे.

**१३.** विमा पॉलिसीचे नुतनीकरण करताना, विमा हप्त्याचे प्रदान विमा कंपनीस **https://easypay.axisbank.co.in/easyPay/makePayment?mid=NTg4MzQ%3D** या लिंकद्वारे करणे बंधनकारक असणार आहे. सदर पेमेंट लिंकचा वापर करुन NEFT/RTGS/UPI अथवा Credit Card द्वारे करता येऊ शकते. **सदर लिंकद्वारे Debit card द्वारे विमा हप्ता प्रदान करता येऊ शकणार नाही.**

**१४.** योजनेमध्ये नुतनीकरणासाठी उपरोक्त लिंक संबंधित विमाधारकास त्याच्या SMS द्वारे मोबाईलवर अथवा ईमेलद्वारे प्राप्त होणार आहे. अशाप्रकारची लिंक प्राप्त न झाल्यास The New India Assurance Co. Ltd. यांचेशी ८६५२४३५९३४/०२२-२६५९००७० या क्रमांकावर संपर्क साधावा.

**१५.** नवीन नोंदणीसाठी अधिदान व लेखा कार्यालय/कोषागार कार्यालय व आहरण व संवितरण अधिकारी यांनी विमाधारकाची व विमा हप्ता प्रदानाची अचूक माहिती विमा कंपनीस कळवावी.

**१६.** वित्त विभाग, शासन निर्णय, समक्रमांक, दिनांक १७/०७/२०१७ अन्वये योजनेमध्ये समाविष्ठ होण्याकरिता कायमस्वरुपी प्रतिबंधीत केलेल्या कर्मचाऱ्यांकडून विमा हप्ता विमा कंपनीच्या खात्यावर जमा होणार नाही, याची खबरदारी अधिदान व लेखा कार्यालय/कोषागार कार्यालये व आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावयाची आहे. त्याकरिता विमा कंपनी, योजनेमध्ये समाविष्ठ होण्याकरिता कायमस्वरुपी प्रतिबंधीत केलेल्या कर्मचाऱ्यांची यादी सर्व कोषागारांना पुरविल व त्यासंबंधीची तरतूद Webform मध्ये सुध्दा करील. सदर यादी आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित कोषागार कार्यालयाकडून प्राप्त करुन घ्यावी.

**१७.** विवाहीत कर्मचाऱ्यांना सदर योजनेमध्ये नवीन नोंदणी व नुतनीकरण करतांना १+३ या पर्यायाचा अवलंब करावा लागणार आहे.

**१८.** तसेच या योजनेमधील वैद्यकीय दाव्यांसंदर्भात अथवा रोकडरहीत (Cashless) सुविधेबाबत कर्मचारी/अधिकारी यांना काही शंका असल्यास MD India (TPA-त्रयस्थ प्रशासक) यांचेशी **Toll Free No. १८००-२०९-७७७७/१८००-२०९-७८००** अथवा **९३७०५५०४४९** या भ्रमणध्वनी क्रमांकावर संपर्क साधता येईल. तसेच विमा हप्ता भरण्यासंदर्भात काही शंका असल्यास **The New India Assurance Co. Ltd.** यांचेशी **८६५२४३५९३४/०२२-२६५९००७०** या क्रमांकावर संपर्क साधता येईल.

**१९.** सदर योजनेच्या सविस्तर कार्यपध्दतीबाबत संचालक (लेखा व कोषागारे), मुंबई यांनी निर्गमित केलेल्या सूचना https://mahakosh.maharashtra.gov.in या संकेतस्थळावरील Circular & Order या पर्यायाखाली उपलब्ध असतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२३०७२४१८१८३३३१०५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR

Digitally signed by DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FINANCE DEPARTMENT, 2.5.4.20=b8e8c3a034acb70f16af6f81c69ca038ff6f25ff78cfc9e6d815fd95b5367b07, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=37A42E182BACE4C129ABBEB54E27836D32D401560638F644A547867205474EE5, cn=DR RAJENDRA UTTAMRAO GADEKAR
Date: 2023.07.25 18:37:02 +05'30'

**( डॉ. राजेंद्र गाडेकर )**
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२. सर्व मा. विधानसभा / विधान परिषद व संसद सदस्य.
३. मा. राज्यपाल यांचे सचिव.
४. मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
५. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
६. सर्व मा.मंत्री व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
७. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
८. सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिनस्त असलेल्या सर्व विभाग/कार्यालयांचे प्रमुख
९. प्रबंधक, मूळ न्यायालय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई
१०. प्रधान महालेखापाल (लेखा परीक्षा)- १, महाराष्ट्र, मुंबई
११. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई
१२. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर
१३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर
१४. आयुक्त, आयकर (TDS) चर्नीरोड, मुंबई
१५. आयुक्त, आयकर (TDS) सिव्हील लाईन, नागपूर
१६. प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा) मुंबई
१७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१८. सचिव, महाराष्ट्र विधीमंडळ सचिवालय, मुंबई

१९. प्रबंधक, लोक आयुक्त व उपलोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
२०. प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई
२१. मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२२. विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली
२३. सर्व विभागीय आयुक्त
२४. सर्व जिल्हाधिकारी
२५. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
२६. संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
२७. संचालक, स्थानिक निधी लेखा परिक्षा, कोकणभवन, नवी मुंबई
२८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
२९. सहसंचालक, लेखा व कोषागारे, कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर
३०. सहसंचालक, स्थानिक निधी लेखा परिक्षा, कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर
३१. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
३२. वित्त विभागातील सर्व कार्यासने
३३. निवड नस्ती/कोषा प्रशा-४.

**शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१४/प्र.क्र.४०/भाग-१/कोषा-प्रशा-४, दि. २४ जुलै, २०२३ सोबतचे सहपत्र**

**परिशिष्ट-१**

प्रति,

**अधिदान व लेखा अधिकारी/कोषागार अधिकारी,**

-------------------------------------------.

## प्रमाणपत्र

प्रमाणित करण्यात येते की, श्री./श्रीम.-------------------------------------------------- (मोबाईल नं.-----------------------------) यांना

१. पीपीओ क्र.------------------------ अन्वये दिनांक-------------पासून निवृत्तीवेतन/ कुटुंबनिवृत्तीवेतन मंजूर झालेले आहे.
२. श्री./श्रीम.------------------------------------------------------हे राज्य शासनाच्या वैद्यकीय प्रतिपूर्तीची विमाछत्र योजनेचे सभासद असून विमा कार्ड नं.------------------ आहे.

आपला,

आहरण व संवितरण अधिकारी यांची स्वाक्षरी

नाव:-
पदनाम:-
कार्यालयाचे नाव:-
डिडिओ सांकेतांक:-

**अथवा**

**घोषणापत्र** (Opting Out Declaration)

१. मी, श्री./श्रीम.-----------------------------------------------------------

पीपीओ क्र.-----------------------अन्य वैद्यकीय विमा कंपनी--------------------------------

---------------- चा सभासद **आहे/नाही**.

२. मी, श्री./श्रीम.---------------------------------- घोषित करतो/करते की, मी राज्य शासनाच्या वैद्यकीय प्रतिपूर्तीच्या विमाछत्र योजनेमध्ये सहभागी होऊ इच्छित नसून भविष्यात देखील या योजनेमध्ये सहभागी होण्याची मागणी करणार नाही.

आपला,

अधिकारी/कर्मचारी यांची स्वाक्षरी

नाव:-
पदनाम:-
कार्यालयाचे नाव:-

शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१४/प्र.क्र.४०/भाग-१/कोषा-प्रशा-४, दि. २४ जुलै, २०२३ सोबतचे सहपत्र

# परिशिष्ट-२

## LIST OF ILLNESS/PROCEDURE

- **Cardiology & Heart Surgery :-** CABG (Bypass Surgery), Open Heart Surgery, Valve replacement or repair, Congenital disease & related surgery, Volvoplasty. Permanent Pacemaker, PTCA Coronary Artery.

- **Orthopaedic Surgery TKR :-** Total Knee Replacement, THR - Total Hip Replacement-Reduction of Fracture, Orthoscopic Repair of Ligaments of Knee, Spinal Surgery (Laminectomy discectomy), Fracture ORIF (Open reduction & internal fixation)

- **Nephrology** Urology (Renal Transplant, Lithotripsy), Dialysis, Kidney failure

- **Oncology** Surgical Management, Radiation, Chemotherapy

- **Neurology** cerebrovascular Surgery, Scull base surgery, Brain Tumour, Intratactablay surgery, congenital defects related epilepsy surgery such as Hydrocephalus Guilin Bar syndrome Infarction of brain tissue, haemorriage and embolization.

- **Ophthalmology :-** Detachment of Retina, Keratoplasty, Vitrectomy, Laser treatment

- **Vascular Surgery :-** Varicose veins, ablation

- **Internal Medicine** Upper Airway Obstruction, COPD

- **Gastroenterology** GE Tract, Laparoscopic cholecystectomy, Liver transplant, all type of surgery related to GI tract, End stage liver disease

- All Organ transplant, traumatic injury to brain, stem cell & bone marrow transplant

- General Brain Fever, PUO

*****